# महाराष्ट्र शासन

क्रमांक : पुरक-२०११/(प्र.क्र. १३२ भाग-२)-(दत्तमत)/का.२३
विधी व न्याय विभाग,
मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० नोव्हेंबर २०११.

विषय : सन २०११-१२ या वित्तीय वर्षाकरिता पूरक अनुदानाचे वाटप २०१४ ( जुलै, २०११ चे अधिवेशन ) बाब क्र.१३२ (२०१४ ०४६८)

संदर्भ : वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक पूरक- २०.११ /प्र.क्र.१४५/अर्थसंकल्प-३ दि. ६ ऑगस्ट, २०११.

ज्ञापन :

सन २०११-१२ या वित्तीय वर्षाचे पूरक खर्चाचे विवरणपत्र दिनांक २५ जुलै, २०११ रोजी विधानमंडळास सादर करण्यात आले व त्यास विधानसभेने मान्यता दिलेली आहे. त्यामुळे दिनांक ३१ मार्च, २०१२ रोजी संपणाऱ्या वित्तीय वर्षाच्या विनियोजनांमध्ये समाविष्ट करण्यासाठी पुरवणी विनीयोजन विधेयकास मा. राज्यपालांनी संमती दिली आहे. ते महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०११ (सन २०११ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. २४) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दि. ५ ऑगस्ट, २०११ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

२. विधानमंडळास सादर केलेल्या उपरोक्त खर्चाचे पूरक विवरणपत्रामधील बाब क्र. १३२ खालील मागणी क्रमांक जे-१ न्यायदान, (०६) केंद्रीय गुन्हे अन्वेषण विशेष न्यायालय (०६)(०१) महाराष्ट्र राज्यात केंद्रीय गुन्हे अन्वेषण विशेष न्यायालयाची स्थापना (२०१४ ०४६८) या लेखाशिर्षातंर्गत विवरणपत्र "अ" नुसार केंद्रीय गुन्हे अन्वेषण विभागाच्या नव्याने स्थापित ६ विशेष न्यायालयासाठी तरतूद करणे (रु. १,७५,३७,०००)( दत्तमत ) इतकी तरतूद करण्यात आली आहे. या न्यायालयाच्या एकूण खर्चाची प्रतिपूर्ती केंद्र शासनाकडून करण्यात येणार आहे. या मंजूर पूरक मागणीचे रुपये १,७५,३७,०००/- इतके अनुदान विवरणपत्र "अ" येथे दर्शविल्यानुसार नियंत्रक अधिकारी ,यांना वितरण करण्यात येत आहे.

३. सदर खर्चाच्या पूरक विवरणपत्रात आकस्मिकता निधीतून घेतलेल्या अग्रिमाच्या भरपाईसाठी समाविष्ट करण्यात आलेल्या पूरक मागण्यांच्या संदर्भातील योग्य त्या कार्यवाहीसाठी महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-एक, महाराष्ट्र मुंबई यांच्या कार्यालयास वित्त विभागाकडून स्वतंत्रपणे विनंती करण्यात आली आहे. तसेच आकस्मिकता निधीतून काढलेला निधी यापुढे आकस्मिकता निधीच्या खर्च खाती न टाकता एकत्रित निधीच्या खाती खर्ची टाकण्याच्या सूचना सर्व संबंधितांना याद्वारे देण्यात येत आहेत.

४. सर्व संबंधित प्रशासकीय कार्यासनांनी प्रस्तुत पुरक विनियोजनाच्या अनुषंगाने आपल्या कार्यासनाशी संबंधित पूरक मागण्याच्या संबंधात मंजुरीचे आदेश निर्गमित करण्याबाबतची कार्यवाही तात्काळ करावी. तसेच पूरक मागण्या जर काही अटी व शर्तीच्या अधिनतेने अर्थसंकल्पित करण्यात आल्या असतील तर त्या अटींची पुर्तता केल्यानंतर, तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला उप विभाग-१ ते ५ अन्वये आवश्यक तेथे वित्त विभागाची मान्यता घेऊन निधी वितरीत करण्यात यावा.

५. प्रस्तुत पुरक विनियोजनावरील पुरक तरतुदींच्या रकमा वितरीत करण्यासाठी संदर्भाधिन परिपत्रकानुसार कार्यवाही करुन मासिक निधी विवरणपत्र अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन संबंधित नियंत्रक अधिका-यांकडे पुरक अनुदान सुपूर्द करण्यात येत आहे. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना आदेशावरुन असे कळविण्यात येते की, त्यांनी आपल्या नियंत्रणाखालील सर्व संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना पूरक विनियोजनावरील रकमा मासिक निधी विवरणपत्रानुसार त्वरीत उपलब्ध करुन देण्यात याव्यात.

६. सदर पूरक अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर झाले आहे त्या प्रयोजनासाठीच खर्च करण्यात यावे.

७. ज्या प्रकरणी आवश्यक असेल त्या प्रकरणी प्रशासकीय मंजुरीचे आदेश प्राप्त झाल्यानंतरच विनिर्दिष्टपूर्वक त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावा. सदर खर्च दिनांक ३१ मार्च, २०१२ अखेरपर्यंत काही अपरिहार्य कारणांमुळे झाला नाही तर सुपूर्द केलेल्या तरतुदींचा विनियोग इतर कोणत्याही अनुषंगिक बाबींवर होणारा अपेक्षित खर्च करण्यासाठी न करता पुरक अनुदानाची रक्कम म्हणून विनिर्दिष्टपूर्वक बचतीची रक्कम म्हणून शासनाकडे तात्काळ प्रत्यार्पित करण्यात यावी.

८. सदरहू ज्ञापन या विभागाच्या धारिका क्र. सीआरसी-२०११/प्र.क्र.९५/का.९ वर वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५७१/२०११, दि. ५.११.२०११ च्या दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वि. श्री. पाटील )
कार्यासन अधिकारी

प्रत, माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित,

महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा) एक, महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) दोन, महाराष्ट्र, नागपूर
प्रबंधक, उच्च न्यायालय, (मूळ/ अपील शाखा), मुंबई
मुख्य न्यायाधीश, शहर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई
प्रमुख न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय, पुणे, अमरावती, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई (दोन प्रती)
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
सह सचिव, विधी व न्याय विभाग, नागपूर / औरंगाबाद
वित्त विभाग (अर्थसंकल्प-११, व्यय-६, अर्थोपाय )
कार्यासन अधिकारी, विधी व न्याय विभाग (का. ३, ४, ८, ९, ११, १२, १३, १४, १७, १८, १९, २२ व २४
का. ७ संगणकावर सदर ज्ञापन अपलोडकरण्याच्या विनंतीसह/
निवड नस्ती.

विवरणपत्र "अ"

क्रमांक जे-१ न्यायदान, (०६) केंद्रीय गुन्हे अन्वेषण विशेष न्यायालय, १०५- दिवाणी व सत्र न्यायलये (०६)(०१) महाराष्ट्र राज्यात केंद्रीय गुन्हे अन्वेषण विशेष न्यायालयाची स्थापना (२०१४ ०४६८)

(रूपये हजारात)

| उद्दिष्ट | नियंत्रक अधिकारी | | | | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| | मुख्य न्यायाधीश, शहर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई | प्रमुख न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय, पुणे | प्रमुख न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय, नागपूर | प्रमुख न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय, अमरावती | |
| ०१- वेतन | ३,४४३ | १,१४८ | १,१४८ | १,१४८ | ६,८८७ |
| ०३- अतिकालिक भत्ता | १ | ० | ० | ० | १ |
| ०६- दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क | १२५.२ | ४१.६ | ४१.६ | ४१.६ | २५० |
| ११-- देशातर्गत प्रवास | १२५.२ | ४१.६ | ४१.६ | ४१.६ | २५० |
| १३-कार्यालयीन खर्च | ४,८४९ | १,५६६ | १,५६६ | १,५६६ | ९,५४७ |
| १४- भाड,पट्टी व कर | १ | ० | ० | ० | १ |
| १६- प्रकाशने | १ | ० | ० | ० | १ |
| १७- संगणक खर्च | २०० | १०० | २०० | १०० | ६०० |
| एकूण | ८,७४५.४ | २,८९७.२ | २,९९७.२ | २,८९७.२ | १७,५३७ |